**सामाजिक वनीकरण विभागाचे अधिकाऱ्यांनी शासकीय कामासाठी महाराष्ट्राबाहेर दौरा / प्रशिक्षणास जाणेपूर्वी प्रशासकीय विभागाची मान्यता घेणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**शासन परिपत्रक क्र. आस्था २०११/प्र.क्र.८२/जल-१३**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : १ जून, २०११**

**वाचा : शासन निर्णय क्र.आस्था १०९२/प्र.क्र.१०/जल-६, दिनांक :१/८/१९९२**

**परिपत्रक :**

शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र.आरओबी १०९२/सीआर ३०/९२/ओ ॲन्ड एम, दि.५/६/१९९२ अन्वये जलसंधारण विभागाची स्थापना करण्यात आली आहे. त्यानुसार दि.१/८/१९९२ च्या शासन निर्णयानुसार जलसंधारण विभागाकडे हस्तांतरीत करण्यात आलेल्या सामाजिक वनीकरण यांच्या अधिनस्त असलेल्या अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय बाबी जलसंधारण विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणल्या आहेत.

२. सामाजिक वनीकरण विभागाच्या संबंधित प्रशासकीय कामकाजावर देखरेख करण्याचे, शासनाच्या विविध योजना, प्रकल्प व शासनाचे धोरण यांच्या अंमलबजावणीचे काम प्रशासकीयदृष्ट्या सुकर व्हावे याची जबाबदारी जलसंधारण विभागाकडे सोपविण्यात आली आहे.

३. सामाजिक वनीकरण विभागाकडे कार्यरत असलेले अधिकारी महाराष्ट्राबाहेर शासकीय कामानिमित्ताने किंवा त्यांचेसाठी महाराष्ट्राबाहेर आयोजित केलेल्या प्रशिक्षणासाठी बऱ्याच वेळा जातात. तथापि असे अधिकारी, अशा निमित्ताने, महाराष्ट्राबाहेर शासकीय कामानिमित्ताने किंवा प्रशिक्षणासाठी जाण्यापूर्वी विभागाच्या प्रशासकीय नियंत्रण अधिकाऱ्याची पूर्व मान्यता घेत नाहीत त्यामुळे सामाजिक वनीकरण विभागाच्या एकूण कार्यपध्दतीमध्ये प्रशासकीय अडचणी निर्माण होतात व पर्यायाने जलसंधारण विभागाच्या एकूण कामकाजावर त्याचा विपरित परिणाम होतो असे शासनास आढळून आले आहे. ही अत्यंत गंभीर बाब असून ती प्रशासकीय नियमावलीचा भंग करणारी आहे.

४. यास्तव, सामाजिक वनीकरण विभागाच्या अधिकाऱ्यांनी शासकीय कामानिमित्ताने किंवा त्यांचेसाठी आयोजित केलेल्या महाराष्ट्राबाहेरील प्रशिक्षणास महाराष्ट्राबाहेर जाण्यापूर्वी प्रशासकीय विभागाचे नियंत्रण अधिकारी म्हणून प्रधान सचिव (जलसंधारण) यांची पूर्व परवानगी घ्यावी.

सदरहू आदेशाचे तात्काळ काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदरहू शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०११०६०२११३०१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(वि.गिरिराज)**
**शासनाचे प्रधान सचिव**

**प्रति,**

**मा.मंत्री (जलसंधारण व रो.ह.यो.) यांचे खाजगी सचिव,**
**प्रधान मुख्य वन संरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर**
**प्रधान मुख्य वन संरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे**
**सर्व मुख्य वनसंरक्षक व उप महासंचालक, सामाजिक वनीकरण वृत्त,**
**सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण विभाग,**
**निवड नस्ती जल-१३ कार्यासन**